माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दल (Ex-CAPF) या दलातील कर्मचाऱ्यांना माजी सैनिकांच्या सोई-सुविधा अनुज्ञेयतेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः न्याय-२०१४/कोर्ट-९/(प्र.क्र.२४४/१४)/२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: - ११/०९/२०१४.

**संदर्भ :**

१) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे ज्ञापन क्र.२७०११/१००/२०१२-RW, दि.२३/११/२०१२.

२) केंद्रीय शासनाच्या केंद्रीय कर्मचारी, वैयक्तिक गाऱ्हाणी आणि निवृत्तीवेतन मंत्रालयाची अधिसुचना क्र.३६०३४/(I)०६-Estt(SCT), दिनांक ०४/१०/२०१२.

३) केंद्रीय संरक्षण मंत्रालयाचे पत्र क्र.०५१५/Gen/DGR/Emp-३, दिनांक १९/०२/२०१३.

**परिपत्रक**

केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने दि.२३/११/२०१२ च्या ज्ञापनाव्दारे केंद्रीय हत्यारी पोलीस दल (CAPF) अंतर्गत येणारी (Central Reserve Police Force (CRPF)/ Border Security Force (BSF)/ Central Industiral Security Force (CISF)/ Indo-Tibetan Border Police (ITBP)/ and Sashastra Seema Bal (SSB) ) या दलातील कर्मचाऱ्यांना माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दलाचा (Ex-CAPF) दर्जा देण्यात आलेला आहे. राज्य शासन/केंद्रशासीत प्रदेश यांनी माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दलातील कर्मचाऱ्यांना सैन्य दलातील माजी सैनिकांना देण्यात येत असलेल्या फायद्यांच्या धर्तीवर सुयोग्य फायदे देण्याबाबत सुचित केले आहे. त्यानुषंगाने सदर फायदे लागू करणेबाबत विविध संघटनांचे, लोकप्रतिनिधी यांचे तसेच वैयक्तिक संदर्भ प्राप्त होत आहेत.

त्यानुषंगाने स्पष्ट करण्यात येते की, केंद्रीय हत्यारी पोलीस दल (CRPFs) या दलातील कर्मचाऱ्यांना "माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दलाचा कर्मचारी" (Ex-CAPF) दर्जा दिलेला आहे. माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दलातील (Ex-CAPF) कर्मचारी हे केंद्र शासनाच्या दिनांक ०४/१०/२०१२ च्या अधिसुचनेन्वये माजी सैनिक या व्याख्येत बसत नसल्याने ते माजी सैनिक होत नाहीत. तसेच केंद्रीय संरक्षण मंत्रालयाच्या दिनांक १९/०२/२०१३ च्या पत्रान्वये माजी केंद्रीय हत्यारी पोलीस दलातील (Ex-

CAPF) कर्मचारी हे माजी सैनिक नाहीत, असे स्पष्ट केले आहे. त्यामुळे **माजी सैनिकांना देण्यात येणाऱ्या सोई-सुविधा, केंद्रीय हत्यारी पोलीस दलातील (Ex-CAPF) कर्मचाऱ्यांना लागू होणार नाहीत.**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१८३८०५६७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gosavi Pradeep P

Digitally signed by Gosavi Pradeep P
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Gosavi Pradeep P
Date: 2014.09.12 18:32:44 +05'30'

**( प्र.प्र.गोसावी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३) मा.मुख्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

४) मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

५) सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य/सर्व खासदार,

६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (शाखा ड-५/ड-६)(२ प्रती),

७) कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

८) सर्व जिल्हाधिकारी,

९) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

१०) सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद

११) सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,

१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

१३) सामान्य प्रशासन विभाग/कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१४) सामान्य प्रशासन विभाग/कार्या.१९-अ, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१५) निवड नस्ती (दोन प्रती)

१६) प्रत संग्रहार्थ.